**मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, यांच्या आस्थापनेवरील १४ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी ०३१७ /प्र.क्र.६४ /फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०१७

**वाचावे :-**

१. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०१.१६/प्र.क्र.१०/फ-१, दिनांक :- १३.१०.२०१६
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ह्यांचे पत्र कक्ष-३/योजनेतर/प्र.क्र.११/१६-१७/१८४० दि. ३०.१२.२०१६
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि. १०.०२.२०१७

**शासन निर्णय :-**

मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, व्याघ्र प्रकल्प, मेळघाट यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या केलेल्या १४ अस्थायी पदांना सन २०१६-१७ मध्ये संदर्भ क्रमांक ०१ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१६ ते दिनांक २८.०२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे. आता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ह्यांचे संदर्भीय पत्रान्वये सदर पदे ०१.०३.२०१७ ते २८.०२.२०१८ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

२. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार शासन निर्णय संदर्भ क्र. ३ अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत.

३. प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांच्या आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) कोणत्याही परिस्थितीत **३० एप्रिल, २०१७ अखेरपर्यंत** उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याच्या अटीवर मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, व्याघ्र प्रकल्प, मेळघाट यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या केलेल्या १४ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या केलेल्या १४ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्य जीवन

(योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वन संरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (०१) प्रशासन व संरक्षण, (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४, क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६ , क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१.०९.२०१६ व क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दि. १०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१६०००२३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2017.03.04 16:01:37 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४. मुख्य वनसंरक्षक आणि क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती,
५. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), म.रा.मुंबई/नागपूर,
६. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

***********

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३१६ /प्र.क्र. ६४/फ-१,**
**दिनांक :- ०४ मार्च, २०१७ सोबतचे विवरणपत्र**

---

**दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | उप वनसंरक्षक | २ |
| २ | सहायक वनसंरक्षक | २ |
| ३ | वनरक्षक | १ |
| ४ | मुख्य लेखापाल | ३ |
| ५ | सर्व्हेक्षक | २ |
| ६ | टपाल वाहक | १ |
| ७ | पाणीवाला | २ |
| ८ | सफाई कामगार | १ |
| | **एकूण अस्थायी पदे** | **१४** |